**बांधकाम कामगारांची नोंदणी-**
**धडक मोहीम घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक संकिर्ण-२०१५/प्र.क्र.३५०/नवि-२०**

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२

दिनांक:- २७ जून, २०१७.

वाचा:- शासन परिपत्रक नगर विकास विभाग क्र:- संकिर्ण २०१४/प्र.क्र.३५०/नवि-२०, दिनांक:-०६.११.२०१५

**प्रस्तावना:-**

शासन परिपत्रक नगर विकास विभाग क्र. संकिर्ण २०१४/प्र.क्र.३५०/नवि-२०, दिनांक:-०६ नोव्हेंबर २०१५ अन्वये, बांधकाम कामगारांची नोंदणी-धडक मोहीम घेण्याबाबत सर्व नागरी स्थानिक संस्थांना निर्देश देण्यात आले आहेत.

सदर परिपत्रकासोबत देण्यात आलेल्या नमूना प्रमाणपत्रामध्ये बांधकाम कामगाराने ९० दिवस काम केल्याचा उल्लेख करण्यात आलेला नव्हता. या त्रुटीचा गैरफायदा अपात्र लाभार्थी घेत असल्याची शक्यता कामगार आयुक्तांनी वर्तवली आहे. त्या अनुषंगाने सुधारित प्रमाणपत्र देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

उपरोक्त नमुद परिस्थितीत शासन परिपत्रक नगर विकास विभाग संकिर्ण क्र. २०१४/प्र.क्र.३५०/नवि-२०, दिनांक ०६.११.२०१५ सोबतच्या प्रमाणपत्रात बांधकाम कामगाराने ९० दिवस काम केल्याचा उल्लेख नसल्याने, या परिपत्रकासोबत जोडलेल्या सहपत्रातील प्रमाणपत्रात बांधकाम कामगारास नोंदणी प्रमाणपत्र देण्याबाबत आवश्यक कार्यवाही सर्व नागरी स्थानिक संस्थांनी करावी. तसेच सदर प्रमाणपत्र देताना कामगारांच्या वास्तव्याचा अधिकृत पुरावा व अधिकृत फोटो असलेल्या ओळखपत्राचा नमुना अर्जासोबत घेण्यात यावा.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०६२७१३११५२१७२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fdbaa1d64146913669652db09801ad2747641d9f84fcf576e55f7050a8df530d, cn=Jayasingrao N Patil
Date: 2017.06.27 13:08:18 +05'30'

**(ज. ना. पाटील)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई

२) सर्व सन्मानीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा.राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
७) मा.मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
८) प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-१), मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२), मंत्रालय, मुंबई
१०) प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
११) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१२) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१३) मुख्याधिकारी, नगरपरिषदा / नगरपंचायती (सर्व)
१४) कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदरचा शासन निर्णय विभागाच्या नागरीकांची सनदवर प्रसिध्द करावा.
१५) निवडनस्ती (नवि-२०)

**शासन परिपत्रक क्रमांक- संकिर्ण-२०१५/प्र.क्र.३५०/नवि-२०,**
**दिनांक २७ जून, २०१७ सोबतचे सहपत्र**

**प्राधिकरणाचे नाव व पत्ता..................................**
...................................
....................................

**प्रमाणपत्र**
**(बांधकाम कामगाराने मागील एका वर्षात ९० दिवस काम केल्याचा दाखला)**

प्रमाणित करण्यात येते की, /श्रीमती..............................................वय...................नाका बांधकाम कामगार म्हणून .................................. नाक्यावर रोजंदारीवर बांधकामाचे काम करतात. त्यांनी मागील वर्षात ९० दिवसांपेक्षा अधिक दिवस खालील मालकांकडे काम केलेले आहे.

| **अ.क्र.** | **मालकाचे नाव** | **मालकाचा पत्ता** | **कामाचे स्वरूप** | **कालावधी** | | **मालकाची स्वाक्षरी** |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | **पासून** | **पर्यंत** | |
| १. | | | | | | |
| २. | | | | | | |
| ३. | | | | | | |
| ४. | | | | | | |
| **मागील वर्षाभरात काम केलेले एकूण दिवस** | | | | | | |

श्री/श्रीमती .................................... हे बांधकाम कामगार म्हणून काम करत असल्याची खात्री केलेली असून त्याबाबत आज दिनांक.................. रोजी प्रमाणपत्र देत आहे.

प्राधिकृत अधिकाऱ्याचे नाव...................................
पदनाम................................
स्वाक्षरी....................................

१. बांधकाम कामगाराचे नाव........................................
२. पत्ता........................................
३. मोबाईल नंबर......................................